**जायकवाडी प्रकल्प औरंगाबाद च्या पैठण डावा कालवा कि.मी १/८२३ मधील सायफन (Syphon) दुरुस्ती "विस्तार व सुधारणा व विशेष दुरुस्ती " अंतर्गत कामांना प्रशासकीय मान्यता .**

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः प्रमा २०१४/ ( ४०७ /१४) सिंव्य(कामे)**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

तारीख: ०९ .०९.२०१४

वाचा

**कार्यकारी संचालक,जा. क्र गोमपाविमं/लाक्षेवि/जसंवि /तांशा २/ ४३०६ दि. २२/७/२०१४**

**प्रस्तावना**

जायकवाडी प्रकल्प पैठण डावा कालवा हा औरंगाबाद,जालना,परभणी जिल्हयातुन वाहतो. पैठण डाव्या कालव्यावर औरंगाबाद जिल्हयात ७,६२० हे. जालना जिल्हयात ३६,५८० हे.परभणी जिल्हयात ९७,४४० हे.लाभक्षेत्र आहे. एकुण लाभक्षेत्र १,४१,६४० हे.इतके आहे. पैठण डाव्या कालव्याचे मुळ बांधकाम सन १९७४ ते १९७६ दरम्यान म्हणजेच ३८ वर्षापुर्वी झालेले आहे. पैठण डावा कालवा कि.मी.१/८२३ वर सायफन असून त्याची पाहणी केली असता, आतील बाजूस गनायटींगचे काम करणे आवश्यक आहे सायफनच्या बाहेरील बाजूचे जॅकेटीगचे काम मराठवाडा पॅकेज योजनेतंर्गत झालेले आहे. व आतील भागातील बॅरेलमधून होणारी गळती थांबविण्यासाठी व काही ठिकाणी गज उघडे पडले आहेत त्यासाठी गनायटींगचे काम आवश्यक आहे. सायफनमध्ये मोठया प्रमाणावर गाळ , दगड , डेंब्रीज, इ पडलेले असल्याने पाणी वहन होण्यास अडथळा होत आहे. त्यामुळे सुध्दा हे काम करणे आवश्यक आहे. पैठण डावा कालवा किमी १.८२३ मधील सायफन (Syphon) दुरुस्ती चा प्रस्ताव विस्तार व सुधारणा विशेष दुरुस्ती अंतर्गत सादर करण्यात आला आहे. वरील बाब लक्षात घेता सदर प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय**

या शासन निर्णयाव्दारे जायकवाडी प्रकल्प औरंगाबाद च्या पैठण डावा कालवा कि.मी १/८२३ मधील सायफन (Syphon) विशेष दुरुस्ती कामाकरीता रु. १००.९१ लक्ष (कामावरील खर्च रु ९१.७४ लक्ष व अनुषंगिक खर्च रु ९.१७ लक्ष ) एवढया खर्चाच्या प्रस्तावास खालील अटींच्या अधीन राहून सोबतच्या परिशिष्टाप्रमाणे प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे

१) शासन परिपत्रक क्र संकीर्ण २००९/(४६५/२००९) मोप्र २ दिनांक १५.१.२०१० मधील अटींच्या अधिन राहून दुरुस्तीची कामे करण्यात यावीत

२) विशेष दुरुस्तीचे काम यांत्रिकी विभागाकडून करुन घेण्यात यावे. प्रकल्पाचे काम नियोजित वेळेत व प्रशासकीय मान्यतेच्या तरतूदीच्या मर्यादेत पुर्ण करण्यात यावे. ही कामे करण्याकरीता भौतिक व आर्थीक नियोजन करुन कार्यपूर्तेतीबाबत विविध टप्यांचे दिनांकासहीत (miles stones) निर्धारित करण्यात यावे. सदर दिनांकानुसार miles stone साध्य करणे अपेक्षित असून जर त्यात दिरंगाई झाल्यास दंड (Penalty) आकारण्याची व लवकर साध्य झाल्यास प्रोत्साहन (Incentive) देण्याची तरतूद निविदेमध्ये करण्यात यावी

३) सदरची कामे कार्यारंभ आदेश काढल्यापासून कामे पूर्ण होईपर्यत त्रैमासिक प्रगती अहवाल (Quarterly Progress Report - QPR) शासनास सादर करावा.

४) काम पुर्ण झाल्यास कामाचे पूर्णत्व अहवाल व प्रमाणपत्र (Completion report & Certificate) शासनास सादर करावे.

या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिंव्य (कामे) कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये क्र. ५५ वर नोंदविण्यात आलेली आहे.

या कामावर होणारा खर्च ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधाऱ्यावरील भांडवली खर्च (योजनातंर्गत) (१२) विस्तार व सुधारणाखाली भाग भांडवली अंशदान (१० ) ( ०२ ) गोदावरी मराठवाडा विकास महामंडळ भाग भाडंवली अंशदान(४७०१ जे १४९ ) या मुख्यलेखाशिर्षाखाली प्रस्तावित करण्यात येत आहे

हा शासन निर्णय (वित्त विभाग) क्र विअप्र १०.०८/प्रक्र ७०/२००८/विनियम, दि.१५.५.२००९ मधील भाग-पहिला उपविभाग -३ मधील अ.क्र.४ मध्ये विहित केलेल्या खर्चाच्या बाबतीत रु ५ कोटीपर्यत प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार संबधित विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार सदर प्रस्तावास मान्यता देण्यास हरकत नाही.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९०९१८४८४९७०२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kirankumar Laxman Sankhe

Digitally signed by Kirankumar Laxman Sankhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Kirankumar Laxman Sankhe
Date: 2014.09.09 19:32:44 +05'30'

कि.ल.संखे
शासनाचे कक्ष अधिकारी

प्रत,

१. महालेखापाल १/२(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
२. महालेखापाल १/२(लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
३. मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन,मुंबई
४. मा.सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन,मुंबई
५. मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन,मुंबई
६. मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन,मुंबई
७. स्वीय सहायक, मा. मंत्री, जलसंपदा (मकृखोविम वगळून), मंत्रालय, मुंबई,
८. स्वीय सहायक, मा. मंत्री, जलसंपदा (मकृखोविम), मंत्रालय, मुंबई,

९. स्वीय सहायक, मा. राज्यमंत्री, जलसंपदा, मंत्रालय, मुंबई,
१०. स्वीय सहायक, प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
११. स्वीय सहायक, प्रधान सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद
१३. मुख्य अभियंता(पा) व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१४. मुख्य अभियंता, (यांत्रिकी) जलसंपदा विभाग, नाशिक
१५. मुख्य अभियंता व मुख्य प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, औरंगाबाद
१६. आंतरवित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१७. माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
१८.उप सचिव, (सिंव्य), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१९.अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, औरंगाबाद
२०.अधीक्षक अभियंता, यांत्रिकी मंडळ, नाशिक
२१.अवर सचिव (सिंव्य/कामे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
२२.कार्यकारी अभियंता, जायकवाडी पाटबंधारे विभाग, नाथनगर, पैठण
२३.उप अभियंता, सिंव्य(कामे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
२४.ग्रंथालय, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई,
२५.सिंव्य(कामे)/कार्यासन, संग्रहार्थ.

शासन निर्णय क्र प्रमा २०१४/( ४०७ /१४) सिंव्य(कामे) दि.०९.०९.२०१४ चे सहपत्र

| अ.क्र. | कामांचे नांव | एकूण रक्कम (रु लक्ष) |
|---|---|---|
| १) | कामावरील खर्च<br>सायफनची आतील बाजूची दुरुस्ती | ७७.३७ |
| २) | नाला रिग्रेडेशन | १.६६ |
| ३) | सायफनचे u/s व d/s बाजूस अस्तरीकरण | १२.७१ |
| | एकूण | ९१.७४ |
| | अनुषंगिक खर्च १० टक्के | ९.१७ |
| | एकूण | १००.९१ |

Kirankumar Laxman Sankhe

Digitally signed by Kirankumar Laxman Sankhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Kirankumar Laxman Sankhe
Date: 2014.09.09 19:33:13 +05'30'

कि.ल.संखे

शासनाचे कक्ष अधिकारी